महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण परीक्षा
मंडळामार्फत कला अभ्यासक्रमाच्या
घ्यावयाच्या पदविका/प्रमाणपत्र परीक्षा
कला संचालनालयामार्फत घेणे...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक:-एडीआर-२००९/(९१/०९)/तांशि-६
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २९ ऑक्टोबर, २००९.

वाचा:- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एडीआर-१४०५/२१२/०५/ तांशि-७, दिनांक ३१.८.२००७.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.एडीआर-२००८/(७०/०८)/ तांशि-६, दिनांक ६ फेब्रुवारी , २००९

<u>प्रस्तावना</u> :- कला संचालनालयाशी संबंधित सर्व शैक्षणिक उपक्रम , कला अभ्यासक्रम व त्यासंबंधीच्या परीक्षा इ. सर्व बाबी कला संचालनालयाच्या स्थापनेपासून कला संचालनालयाकडून राबविण्यात येत होत्या.

संदर्भिय क्र. १ वरील शासन निर्णयानुसार कला विषयाशी संबंधित (i) कला शिक्षक प्रशिक्षण, (ii) शिल्पकला व प्रतिमानबंध, (iii) कला शिक्षणशास्त्र पदविका, (iv) उपयोजित कला, (v) रेखा व रंगकला, (vi) अंतर्गत गृहसजावट, (vi) मातकाम, (vii) मुलभूत अभ्यासक्रम, (ix) वस्त्रकला, (x) धातूकाम, (xi) सिरॅमिक पॉटरी, (xii) कला शिक्षक प्रमाणपत्र अभ्यासक्रम व या अभ्यासक्रमाच्या परीक्षा कला संचालनालयाकडून न राबविता सन २००८-०९ पासून त्या महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत राबविण्याबाबतचे आदेश शासन स्तरावरुन निर्गमित करण्यात आले. मात्र कला संचालनालयाकडील अभ्यासक्रम व परीक्षा पध्दती महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाचा अभ्यासक्रम व परीक्षा पध्दती यामध्ये भिन्नता असल्याने अभ्यासक्रम राबविणे, परीक्षांचे सुनियोजित आयोजन करणे, मंडळास शक्य झाले नाही. तसेच त्यामध्ये अनेक तांत्रिक अडचणी उद्‌भवल्या. त्यामुळे महाराष्ट्र तंत्र शिक्षण मंडळाने कला संचालनालयाच्या अंतर्गत येणा-या विषयाच्या परीक्षा घेण्यास असमर्थता दर्शविली.

कला संस्थांनी विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान टाळण्याचे दृष्टीने संबंधित परीक्षा प्रणाली महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडून राबविण्याबाबतच्या शासनाच्या निर्णयाबाबत नाराजी व्यक्त करुन त्याबाबत तीव्र विरोध दर्शविला. तसेच कला संचालनालयाच्या परीक्षा पूर्वीप्रमाणेच महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत न घेता पूर्ववत कला संचालनालयाकडून घेण्याबाबतची मागणी करण्यात आली.

महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळास परीक्षा राबविण्यामध्ये येणा-या अडचणी, संघटनांचा तसेच संस्थांचा विरोध व विद्यार्थ्यांचे होणारे शैक्षणिक नुकसान विचारात घेता कला संचालनालयाकडून घेण्यात येणा-या सर्व परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळाकडून घेण्याचा निर्णय रद्द करुन त्या कला संचालनालयाकडून घेण्याबाबत प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय:-</u> कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील वर नमूद केलेल्या बारा अभ्यासक्रमाच्या परीक्षा हया महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडून घेण्याबाबतचे संदर्भाधीन (१) व (२) वरील दिनांक

३१.८.२००७ व दि. ६ फेब्रुवारी, २००९ चे आदेश रद्द करुन उपरोक्त अभ्यासक्रमाच्या परीक्षा हया महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडून न घेता पूर्वीप्रमाणेच कला संचालनालयाकडे हस्तांतरीत करण्यास शैक्षणिक वर्ष २००९-१० पासून शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. कला संचालनालयाच्या अधिपत्याखालील वर नमूद केलेले पदविका परीक्षा अभ्यासक्रम महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाकडून पुन्हा हस्तांतरीत करुन कला संचालनालयाकडून राबविण्याच्या दृष्टीने आवश्यक बाबींची पूर्तता तात्काळ करण्यात यावी.

प्रस्तुत शासन निर्णय www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २००९१०२९१३२५२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रं. रा. दौरसटवार)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

१. महालेखापाल, लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता, मुंबई
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. मा. मंत्री , (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई
६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई
९. संचालक, तंत्र शिक्षण , महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. अधिष्ठाता, सर ज.जी. कला. महाविद्यालय, मुंबई
१२. अधिष्ठाता, सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालय, मुंबई
१३. अधिष्ठाता, शासकीय कला महाविद्यालय, नागपूर/ औरंगाबाद
१४. निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. परीक्षा नियंत्रक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. सर्व शासनमान्य कला संस्था, (कला संचालनालयामार्फत)
१७.निवडनस्ती- तांशि-६